महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाच्या कार्यालयातील अस्थायी पदांना दि.१.१०.२०१८ ते दि.२८.२.२०१९ पर्यंत मुदतवाढ देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## मराठी भाषा विभाग

शासन निर्णय क्रमांकः अस्थाप-२०१८/प्र.क्र.२३/आस्था-२,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २८ सप्टेंबर,२०१८.

**वाचा-** १) सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्रमांक-संकीर्ण-२००१/प्र.क्र.२९८/सां.का.१, दिनांक २३.०३.२००६
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/विसु-१, दिनांक ११.०२.२०१६
३) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/वित्तीय सुधारणा-१, दिनांक २१.०९.२०१६.
४) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०५.०३.२०१८.
५) मराठी भाषा विभाग, शासन निर्णय, क्रमांक:अस्थाप-२०१८/प्र.क्र.२३/आस्था-२, दि.१५.०३.२०१८.
६) महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ यांचे पत्र क्र. सामंमं-२०१८/३६११, दि.१७.०९.२०१८.
७) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि. ०७.०९.२०१८.

### शासन निर्णय

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई येथील खालील ४ अस्थायी पदांना संदर्भ क्र. ५ येथील दि.१५.०३.२०१८ च्या शासन निर्णयान्वये दिनांक १ मार्च २०१८ ते ३० सप्टेंबर २०१८ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे.

२. आता संदर्भ क्र.७ येथील दि.०७.०९.२०१८ च्या शासन निर्णयातील प्राधिकारानुसार महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई कार्यालयातील खालील तक्त्यात दर्शविलेल्या ४ अस्थायी पदांना विहित अटींच्या अधीन राहून **दिनांक १ ऑक्टोबर २०१८ ते २८ फेब्रुवारी २०१९** पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | अस्थायी पदसंख्या | वेतनश्रेणी |
|---|---|---|---|
| १ | सहायक लेखा अधिकारी | १ | ९३००-३४८०० ( ग्रेड वेतन रु.४४००) |
| २ | निम्नश्रेणी लघुलेखक (मराठी) अध्यक्षांचे स्वीय सहायक | १ | ९३००-३४८०० (ग्रेड वेतन रु.४३००) |
| ३ | लिपिक-टंकलेखक | १ | ५२००- २०२०० (ग्रेड वेतन रु.१९००) |
| ४ | वाहन चालक | १ | ५२००- २०२००(ग्रेड वेतन रु.१९००) |
| | **एकूण अस्थायी पदे** | **४** | |

३. उपरोक्त बाबीवर होणारा खर्च " मागणी क्रमांक झेडएफ - ०२, २२०५, कला व संस्कृती, ००, १०२, कला व संस्कृती प्रचालन (०१) अनिवार्य (०१) (०१) राज्य साहित्य व संस्कृती मंडळ (अनिवार्य) (२२०५३१७२) ०१ वेतन" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०१८-२०१९ या वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक **२०१८०९२६१२३१३२९९३३** असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

M. P. Kudtarkar

Digitally signed by M. P. Kudtarkar
Date: 2018.09.28 16:48:28 +05'30'

**(मं.प.कुडतरकर)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई.
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा व परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
५) कोषागार अधिकारी, मुंबई.
६) वित्त विभाग (व्यय-४) व आकृतीबंध पुनरर्चना कक्ष, मंत्रालय, मुंबई.
७) मराठी भाषा विभागाची सर्व कार्यासने.
८) निवडनस्ती.